संगणक संकेतांक
२०१०१०२०११७५१३६००१

**खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांच्या पात्रतेचे निकष, अटी व शर्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.बीटीपी २००८/प्र.क्र.१६०८/उद्योग-२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : १० फेब्रुवारी, २००९**

**वाचा : शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.बीटीएच-२००१/(५०५८)/ उद्योग-२, दिनांक २९.१.२००२.**

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्राचे जैव तंत्रज्ञान धोरण, सन २००१ मध्ये जाहीर करण्यात आले आहे. जैव तंत्रज्ञान विषयांतर्गत कृषी, औषधे, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय, मस्त्य व्यवसाय, आरोग्य, पर्यावरण आदी बाबींचा समावेश होतो. या धोरणात जैव तंत्रज्ञान घटकांना मुद्रांक शुल्क माफी, निजी वापरासाठी वीज निर्मिती, विद्युत शुल्क माफी, जकात परतावा इत्यादी सवलती देण्यात आल्या आहेत. तसेच महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने व इतर सार्वजनिक उपक्रमानी आणि निर्दिष्टित क्षेत्रामध्ये विकसीत केलेल्या उद्यानातील जैव तंत्रज्ञान घटकांना अनुज्ञेय चटई क्षेत्राच्या दुप्पट चटई क्षेत्र विकसीत करावयाची तरतूद करण्यात आलेली आहे. याखेरीज जैव तंत्रज्ञान उद्यानांना काही विशेष सवलती देण्याची तरतूदही धोरणात करण्यात आली आहे.

जैव तंत्रज्ञानास प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीने व जैव तंत्रज्ञान क्षेत्रात मोठया प्रमाणावर गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी राज्यात खाजगी गुंतवणूकीच्या माध्यमातून जैव तंत्रज्ञान उद्याने विकसीत होणे आवश्यक आहे. त्यामुळे खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यान हरित क्षेत्र / ना-विकास क्षेत्र / वाणिज्यिक क्षेत्र यामध्ये अनुज्ञेय करणे व जैव तंत्रज्ञान उद्यानांसाठी १०० टक्के अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक मंजूर करणे, कार्यप्रणाली, निकष व अटी ठरविणे, याबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्राचे नवीन औद्योगिक, गुंतवणूक व पायाभूत सुविधा धोरण, २००६ यामध्ये जैव तंत्रज्ञान हे भर देण्यायोग्य क्षेत्र म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यामुळे या शासन निर्णयान्वये माहिती तंत्रज्ञान उद्यानांचे धर्तीवर खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यान हरित क्षेत्र / ना-विकास क्षेत्र / वाणिज्यिक क्षेत्र / औद्योगिक क्षेत्र यामध्ये अनुज्ञेय करण्यात येत आहे. तसेच खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानातील विकास आयुक्त (उद्योग) यांनी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या सक्षम अधिकाऱ्यांनी, उद्योग नोंदणी दिलेल्या जैव तंत्रज्ञान घटकांना १०० टक्के अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक मंजूर करण्यात येत आहे. विकासकामार्फत वापरण्यात येणाऱ्या अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांकासाठी २५% अधिभार (प्रिमियम) रेडीरेकनरप्रमाणे आकारण्यात येईल. सदर सवलत पर्यावरणाच्या नियमाची पूर्तता करणाऱ्या जैव तंत्रज्ञान उद्यानांनाच अनुज्ञेय होईल.

जैव तंत्रज्ञान उद्यानांसाठी पात्रतेचे निकष, अटी व शर्ती ठरवून त्यांच्या नोंदणीची कार्यप्रणाली निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे **"परिशिष्ट अ"** येथे नमूद केली आहेत. "परिशिष्ट अ" ची पूर्तता करणाऱ्या व विकास आयुक्त (उद्योग) यांनी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या सक्षम अधिकाऱ्यांनी, मान्यता दिलेल्या खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांना निर्दिष्टित क्षेत्रातील उद्याने समजण्यात येतील.

सदर शासन निर्णय नगर विकास विभागाच्या अनौपचारिक सं.६०/ए दिनांक ४.२.२००९ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे. तसेच यासंदर्भातील संबंधीत विकास नियंत्रण नियमावलीतील कलमे दुरुस्ती करण्याबाबतची कार्यवाही नगर विकास विभागाकडून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०२१०१७१७४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

छायाअग्निहोत्री

**(छाया अग्निहोत्री)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. प्रधान सचिव, महसूल विभाग (मदत व पुर्नवसन), मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई - ३२.
४. प्रधान सचिव, कृषी व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यविकास विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
६. प्रधान सचिव (उद्योग), मंत्रालय, मुंबई-३२.
७. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई - ३२.
८. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. आयुक्त, महानगर पालिका सर्व
११. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई - ५१
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई - ९३.
१३. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई.
१४. विभागीय आयुक्त, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद, अमरावती, मुंबई.
१५. महानिरिक्षक, नोंदणी व नियंत्रक, मुद्रांक शुल्क, पुणे.
१६. निमंत्रक, उद्योग मित्र, मुंबई.
१७. उपमहानिरिक्षक, मुद्रांक शुल्क, मुंबई.
१८. उद्योग विभागातील सर्व सहसचिव / उपसचिव / कक्ष अधिकारी.
१९. उप सचिव / अवर सचिव (नवि-११), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
२०. कक्ष अधिकारी (म-१), महसूल व वनविभाग मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती.

“परिशिष्ट अ”

**खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांच्या पात्रतेचे निकष, अटी, शर्ती आणि कार्यप्रणालीची अनुसूची.**

**१. निकष :**

खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी विविध परिमाणांकरीता निकष, अटी व शर्ती निश्चित करण्यात आल्या असून सोबतच्या परिशिष्ट - १ मध्ये त्या दर्शविण्यात आल्या आहेत.

**२. कार्यप्रणाली :**

१) प्रस्तावित जैव तंत्रज्ञान उद्यान विकसीत करण्यासाठी प्रवर्तकांना प्रथम इरादापत्र घ्यावे लागेल. सदर इरादापत्राची विधीग्राहयता तीन वर्षाची राहील. सदर कालावधीत जैव तंत्रज्ञान उद्यानाची उभारणी करणे शक्य न झाल्यास विकासकाने सविस्तर समर्थनासह तसेच पुराव्यादाखल कागदापत्रासह इरादापत्राची विधीग्राहयता संपण्यापूर्वी किमान तीन महिने मुदतवाढीसाठी अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अशा प्रकरणात गुणवत्तेच्या निकषांवर पुढील एक वर्षाची दोन वेळा मुदत वाढ देण्यात येईल. इरादापत्रातील परीमाणांप्रमाणे जैव तंत्रज्ञान उद्यान पूर्ण विकसीत केल्यानंतर प्रवर्तकास सदर उद्यान नोंदणीकृत करावे लागेल.

२) इरादापत्र किंवा नोंदणी प्रमाणपत्रातील कोणत्याही बाबीमध्ये बदल करावयाचा झाल्यास प्रर्वतकास / विकासकास स्वतंत्र अर्ज सादर करुन सक्षम अधिकाऱ्याची पूर्व मंजूरी घेणे बंधनकारक आहे. अर्जदारास इरादापत्रात नमूद केलेल्या निकष, अटी व शर्तींची पूर्तता केल्यानंतरच आणि तसा अर्ज केल्यास जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल. विहित निकष आणि अटी शर्तींच्या अधीन राहून गुणवत्तेच्या निकषांवर अर्जदारांची विनंती मुंबई महानगरासाठी मा. विकास आयुक्त (उद्योग), मुंबई आणि राज्यातील उर्वरीत जिल्हयासांठी, संबंधित जिल्हयाचे महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र **हे मान्य करतील.**

३) विकासकाने जैव तंत्रज्ञान उद्यानांसाठी विहीत केलेल्या निकषानुसार विविध बाबींची पूर्तता केली आहे किंवा कसे याच्या पडताळणीसाठी सहामाही प्रगती अहवाल दाखल करणे आवश्यक असेल. त्यामध्ये जैव तंत्रज्ञान उद्यानाच्या व्यवस्थापनेबाबतची व तेथे सुरु असलेल्या उद्योगांची सविस्तर माहिती मागणी केलेल्या प्रपत्रात दरवर्षी देणे बंधनकारक आहे. यासाठी आवश्यकता असल्यास सक्षम **अधिकारी भेटी अंती अहवाल प्राप्त करतील.** तसेच विकासकाने विहीत निकषांची पूर्तता केली नसल्यास मुंबई महानगरासाठी मा. विकास आयुक्त (उद्योग), मुंबई आणि राज्यातील उर्वरीत जिल्हयासांठी, संबंधित जिल्हयाचे महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र हे इरादापत्र / नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्याची कार्यवाही **करतील.**

४) मुंबई महानगरासाठी मा. विकास आयुक्त (उद्योग), मुंबई आणि राज्यातील उर्वरीत जिल्हयांसाठी, संबंधित जिल्हयाचे महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र यांनी मान्यता दिलेल्या घटकांना जैव तंत्रज्ञान उद्यानातील गाळे / बांधकाम क्षेत्रफळ वितरीत करण्याचे विकासकास बंधनकारक राहील.

५) प्रवर्तकांना इरादापत्र प्राप्त करण्यासाठी करावयाच्या विहित अर्जामध्ये विहित परिमाण व निकषाची पूर्तता करण्यासाठी केलेल्या प्रस्तावित व्यवस्थेची सविस्तर माहिती देऊन त्यांच्या पूर्ततेची हमी देणे आवश्यक आहे. तसेच अर्जासोबत जैव तंत्रज्ञान उद्यानात संबंधित सेवा पुरविण्यास तयार असलेल्या संस्थेशी केलेल्या आधारभूत सेवासंबधी (Support Services) कागदपत्रांच्या प्रती प्रवर्तकांनी सादर **करणे आवश्यक आहे.**

६) इरादापत्र आणि नोंदणी यासाठी विहित केलेल्या **अर्जाचे नमुने परिशिष्ट-२** मध्ये व त्यासोबत सादर करावयाच्या **कागदपत्रांची सूची परिशिष्ट -३** मध्ये दर्शविण्यात आली आहे.

७) खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानाकरीता इरादापत्र / नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठी सादर करण्यात आलेला विहीत अर्ज व आवश्यक बाबींची पूर्तता झाल्यानंतर स्थायी प्रमाणपत्र देण्याचे अधिकार मुंबई महानगरासाठी मा. विकास आयुक्त (उद्योग), मुंबई आणि राज्यातील उर्वरीत जिल्हयासांठी, संबंधित जिल्हयाचे महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र यांना प्रदान करण्यात येत आहेत.

८) खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानाची स्थापना करण्याकरीता खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यान विकासकाने सर्व अटींची पूर्तता केल्यास त्यांना खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानाकरीता नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल. खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांच्या व्यवस्थापनाबाबतची माहिती विकासकांनी देणे आवश्यक राहील. जैव तंत्रज्ञान उद्यानामध्ये चालणारे कामकाज / कार्य याबाबतची माहिती प्रत्येकवर्षी देणे तसेच त्यामध्ये बदल आवश्यक असल्यास मुंबई महानगरासाठी मा. विकास आयुक्त (उद्योग), मुंबई आणि राज्यातील उर्वरीत जिल्हयासांठी, संबंधित जिल्हयाचे महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र यांची पूर्व परवानगी घेणे विकासकास बंधनकारक राहील.

९) कार्यान्वित असलेल्या नोंदणीकृत जैव तंत्रज्ञान घटकास स्वतःच्या जैव तंत्रज्ञान उद्योगांसाठी खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यान उभारण्याकरीता परवानगी देण्यात येईल. त्याच प्रमाणे त्यास खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानातील जैव तंत्रज्ञान उद्योगांना देय असलेली मुद्रांकशुल्क माफीची सवलत वगळून (कार्यान्वित असलेल्या नोंदणीकृत जैव तंत्रज्ञान घटकाने मुद्रांकशुल्क माफीची सवलत घेतली असल्यास) खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानातील जैव तंत्रज्ञान घटकांना देय असलेल्या इतर सर्व सवलतींचा लाभ घेता येईल. मात्र त्यासाठी त्यांनी खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानाकरीता आवश्यक असलेल्या प्रचलीत निकषाची पूर्तता करणे अनिवार्य राहील.

१०) जैव तंत्रज्ञान उद्यानांच्या इमारत बांधकामाचे विविध टप्पे किंवा पूर्ण बांधकाम झालेल्या इमारतीचे प्रर्वतक जैव तंत्रज्ञान उद्यान इरादापत्र / नोंदणीपत्रासाठी अर्ज करु शकतील. असे प्राप्त होणारे प्रस्ताव खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी विहीत केलेले निकष पूर्ण करीत असल्यास त्या सर्व प्रस्तावांना इरादापत्र / नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल.

११) बांधकाम पूर्ण झालेल्या इमारतीच्या बाबतीत प्रचलीत विकास नियमानुसार अनुज्ञेय असलेले मूळ चटई क्षेत्र निर्देशांकापेक्षा टीडीआरचा वापर करुन जादा बांधकाम केलेल्या इमारतीबाबत जर ते खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांच्या उभारणीचे मूळ निकष पूर्ण करीत असतील तर अशा प्रस्तावीत

इमारतींना पूर्ण क्षेत्रफळासाठी इरादापत्र / नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल. परंतु त्यांना अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकांची सवलत देण्यात येणार नाही.

१२) खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांचे इरादापत्र विकासकाने स्थानिक प्राधिकरणाकडून इमारत बांधकाम पुर्णत्वाचे प्रमाणपत्र घेतले असल्यास इरादापत्र आपोआप रद्द होईल. विकासकांना खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांची नोंदणी प्रमाणपत्राकरीता संबंधित संस्थेकडे अर्ज करावा लागेल.

१३) खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानातील एकूण बांधकाम क्षेत्रफळापैकी कमीत कमी ९० टक्के बांधकाम क्षेत्र जैव तंत्रज्ञान उद्योग घटकांसाठी व जास्तीत जास्त १० टक्के बांधकाम क्षेत्र पुरक सेवा सुविधांसाठी वापरण्यास परवानगी देण्यात येईल. पुरक सेवांसाठी राखीव असलेल्या या १० टक्के बांधकाम क्षेत्रफळात अंतर्भाव करावयाच्या सेवा सुविधांमध्ये खालील तीन सेवा सुविधांचा अंतर्भाव करण्यात येत आहे.

१) कॅफेटेरिया

२) स्मॉल क्लब हाऊस

३) कॉन्फरन्स अ‍ॅन्ड व्हिडीओ कॉन्फरन्सींग हॉल.

१४) नगर विकास विभागाच्या अधिसूचना/शासन निर्णय/परिपत्रकानुसार खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांना १०० टक्के अतिरिक्त चटई क्षेत्र मंजूर करण्यात येईल हरित क्षेत्र/ना-विकास क्षेत्र/वाणिज्यीक क्षेत्र यामध्ये अनुज्ञेय करण्यात येईल.

१५) **शुल्क** : जैव तंत्रज्ञान उद्यानाच्या इरादापत्रासाठी तसेच नोंदणीसाठी विहीत अर्जासोबत रु. ५०००/- एवढे शुल्क पुढील लेखाशिर्षाखली विकासकांनी रिझर्व्ह बँकेत भरणा केल्याचे दर्शविणाऱ्या चलनाची प्रत जोडण्यात यावी.

Head of the Account
"0851 Village & Small Industries
102, Small Scale Industries
Cottage & Small Industries
00851-002-6"

इरादापत्र आणि नोंदणीपत्राच्या नुतनीकरणासाठी तसेच त्यामध्ये कोणताही बदल करण्यासाठी केलेल्या अर्जासाठी देखील सदर शुल्क लागू राहील.

१६) **सनियंत्रण** : जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी विहित केलेल्या निकष, अटी व शर्तींचे पालन होत असल्याबद्दल संनियत्रंण करण्याची जबाबदारी सर्व संबंधित सक्षम अधिकाऱ्यांची / प्राधिकाऱ्याची राहील.

## परिशिष्ट - १

### खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी विविध परिमाणांकरीता निकष आणि अटी व शर्ती

१. **अर्जदाराची अर्हता :**

१.१ खाजगी जैव तंत्रज्ञान उद्योग, उद्यान स्थापन करणाऱ्या संस्थांची घटना मालकी, नोंदणीकृत भागीदारी संस्था, खाजगी मर्यादित कंपनी, सार्वजनिक मर्यादित कंपनी, सहकारी संस्था अथवा ट्रस्ट यापैकी असावी.

१.२ जैव तंत्रज्ञान उद्यानाकरीता विहित केलेल्या निकष, अटी व शर्तीची पूर्तता करण्यासाठी उद्यानाच्या व्यवस्थापनाबाबत कायदेशीर जबाबदार संस्था, उद्यानाचे प्रवर्तक किंवा विकासक अर्ज करण्यास पात्र आहेत.

२. **खाजगी क्षेत्रातील जैव तंत्रज्ञान उद्यानांच्या विविध परिमाणांचे निकष :**

| अ.क्र. | पायाभूत सोयी सुविधांचे परिमाण | निकष |
|---|---|---|
| १. | जमीन / बांधकाम क्षेत्रफळ | अ) जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी किमान २ एकर जमीन किंवा किमान २०,००० चौ. फूट एवढे बांधकाम क्षेत्रफळ जैव तंत्रज्ञान उद्योग आणि त्यांना पुरवावयाच्या पूरक सेवांसाठी आवश्यक आहे.<br>ब) जैव तंत्रज्ञान उद्यानासाठी आवश्यक किमान बांधकाम क्षेत्रफळ (२०,००० चौ.फूट) किंवा किमान जमीन (दोन एकर ) या निकषाच्या पूर्ततेसाठी अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक / टीडीआर / Free of FSI areas विचारात न घेता फक्त मूळ चटई क्षेत्र निर्देशांक वापरून जैव तंत्रज्ञान उद्यानाचे सदरील निकष पूर्ण करणे आवश्यक राहील. |
| २. | बांधकाम क्षेत्राचे विनियोजन / वापर | एकूण बांधकाम क्षेत्रफळाच्या किमान ९० टक्के बांधकाम क्षेत्रफळ जैव तंत्रज्ञान उद्योग आणि कमाल १० टक्के बांधकाम क्षेत्रफळ (वाहनतळाची जागा वगळून) अनुषंगिक / पूरक सेवा सुविधांसाठी वापरणे बंधनकारक आहे.<br>जैव तंत्रज्ञानाशी संबंधीत पुरक सेवांसाठी जास्तीत जास्त १० टक्के बांधकाम क्षेत्र (एकूण बांधकाम क्षेत्रफळापैकी) वापरण्यात येईल. अशा आशयाचे प्रतिज्ञापत्र विकासकांकडून घेण्यात येईल. |
| ३. | विद्युत पुरवठा, क्षमता व व्यवस्था | खाजगी जैव तंत्रज्ञान उद्यानांत स्थापन होणाऱ्या घटकांची विद्युत पुरवठा मागणी लक्षात घेऊन स्वतंत्र सबस्टेशन उद्यानांच्या आवारात उभारणे आवश्यक आहे. विकासकांना या साठी विद्युत पुरवठा संस्थेकडून उदा. MSEDCL/रिलायन्स एनर्जी, टाटा पॉवर यांचेकडून हमीपत्र / मंजुरी पत्र घ्यावे लागेल. सदर |

| | | |
|---|---|---|
| | | वीज सबस्टेशनला वीज पुरवठा करणाऱ्या कंपनीच्या नजीकच्या स्त्रोत्रातून समर्पित विद्युत वाहिनीच्या माध्यमातून उद्यानाच्या प्रवर्तकास वीज पुरवठा प्राप्त करणे आवश्यक आहे. |
| ४. | राखीव विद्युत पुरवठा व्यवस्था (Standby Electricity | अ) वरील मुद्दा क्र. ३ प्रमाणे निश्चित करण्यात आलेल्या एकूण विद्युत पुरवठा क्षमतेच्या किमान ३० टक्के एवढी राखीव विद्युत निर्मितीची व्यवस्था प्रवर्तकास करणे बंधनकारक आहे.<br>ब) खाजगी जैव तंत्रज्ञान उभारणीस विहीत करण्यात आलेले निकष अटी व शर्ती नुसार उद्यानास लागणाऱ्या एकूण विजेच्या ३० टक्के इतक्या राखीव वीज निर्मीती DG सेटच्या माध्यमातून व्यवस्था करण्याची अट लक्षांत घेता DG सेट खरेदीवरील जकात कर माफी अनुज्ञेय राहील. |
| ५. | जोडणी क्षमता (Connectivity) | १) जैव तंत्रज्ञान उद्यानात सॅटलाईट अर्थ स्टेशन उपलब्ध असल्यास जोडणीच्या क्षमतेची मर्यादा लागू राहणार नाही. अन्यथा किमान ५.० mbps क्षमतेची ओएफसी (OFC) जोडणी पुरविणे आवश्यक आहे.<br>२) उद्यानाच्या आवारात दोन जोडणी सेवा पुरविणाऱ्या कंपनीच्या एक्सचेंजची आवश्यकता नाही. तथापी, उद्यानामध्ये लास्ट माईल कनेक्टीव्हीटी (Last Mile Connectivity) उपलब्ध करुन देण्यासाठी तसेच इंटरनॅशनल कनेक्टीव्हीटीकरीता गेट वे (Gateway for International Connectivity) उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता आहे. |
| ६. | वाहनतळ क्षमता (पार्किंग साठी) | १) जैव तंत्रज्ञान उद्यानाच्या एकूण बांधकाम क्षेत्राच्या अनुषंगाने प्रति १०० चौ.मीटर बांधकाम क्षेत्रासाठी एक वाहन या परिमाणाने वाहनतळ क्षमता उद्यानात उपलब्ध असणे आवश्यक आहे. |
| ७. | प्रदुषण नियंत्रण- हवा, पाणी व घनकचरा व्यवसाय | विकासकांने महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ / पर्यावरण विभागाकडून आणि स्थानिक प्राधिकरणाकडून प्रदुषण नियंत्रणासाठी केलेल्या व्यवस्थापनेबाबतची पूर्व मान्यता घेणे आवश्यक आहे. |
| ८. | पाण्याची मागणी | विकासकाने जैव तंत्रज्ञान उद्यानामध्ये / उद्योजकांना / घटकांना त्यांचे आवश्यकतेनुसार / मागणी नुसार पाणी पुरवठयाची सोय करणे आवश्यक आहे. पुरेशा पाणी पुरवठयाकरीता स्थानिक प्राधिकरणाकडून विकासकास उपलब्धतेविषयी प्रमाणपत्र घ्यावे लागेल. |
| ९. | सामुहिक सुविधा | जैव तंत्रज्ञान उद्यानात हवा, पाणी, घन कचरा निर्जंतूक करण्याची यंत्रणा तसेच किटकापासून बचावासाठी कायमस्वरुपी यंत्रणा उभारणी करणे आवश्यक राहील. |

परिशिष्ट - २

Specimen Application for letter of Intent for proposed Private BT Park / Registration of existing BT Park /Conversion of Letter of Intent to Registration of Private BT Park.

## DIRECTORATE OF INDUSTRIES

## BIO - TECHNOLOGY BRANCH

**(To be submitted along with application fee of Rs.5000/- by way of RBI Challan/DD. Copy of the Challan /DD should be enclosed along with application)**

| Sr.No. | APPLICATION FOR THE PROPOSED BIO-TECHNOLOGY PARK | | |
|---|---|---|---|
| 1) | Developer information | : | |
| | Name of Developer<br>Correspondence Address | : | |
| | Phone | : | |
| | Fax | : | |
| | Email | : | |
| 2) | Constitution of Developer (The copies of relevant documents to be submitted) | : | Proprietary / Partnership /Pvt. Ltd./Public Ltd.Co./ Society/Charitable Trust. |
| 3) | Name of BT Park | : | |
| 4) | Scientific activities proposed in BT Park | : | R & D/ Analytical Service/any other, please specify |
| 5) | Major Domain sector of BT Park | : | Health / Medical<br>Agriculture/ Plant Biotechnology<br>Food Science/ Nutrition<br>Industrial<br>Environmental<br>Bioinformatics<br>Biotech Application<br>Any other, please specify |
| 6) | Source and Disposal of Bio Material waste water, disposal system | : | In house Laboratory collection / external Laboratory collection / Clinical samples Environment any other , please specify |
| 7) | Category of the Biological Systems anticipated to be used in BT Park | : | 1.Bacteria<br>2. Virus<br>3.Algae<br>4.Fungi<br>5.Body fluids<br>6.Blood samples<br>7.Human cell lines<br>8.Plant tissue<br>9.Insect/Animal cell line<br>10.Other please specify |

| | | | |
|---|---|---|---|
| 8) | Specific biological systems and their respective bio-safety levels proposed in BT Park | : | |
| 9) | Nature and constituents of the samples (Biological & Chemical ) to be transferred in and out of BT Park | : | |
| 10) | Indicate the proposed treatment methods and equipments (including the capacity, frequency of operation etc.) for biological waste before segregation into common infrastructure | : | |
| 11) | Indicate the approximate water consumption for the activity per day (24 hours operation) and arrangements thereof. | : | |
| 12) | Fume hoods are proposed to be employed in the activities in BT Park. If so, indicate the equipment to control composition of fumes to minimum standard levels. | : | |
| 13) | Regulatory & Statuary approval required to be taken for the activities of BT Park. | : | 1. Ministry of Environment and Forests (MoEF)<br>2. Genetic Engineering Approval Committee (GEAC).<br>3. Indian Council of Medical Research (ICMR)<br>4. Maharashtra Pollution Control Board (MPCB)<br>5. Drugs and Cosmetics Act, Ministry of Health and Family Welfare<br>6. Atomic Energy Regulatory Board (AERB)] Govt. of India<br>7. CPCSEA (Committee on Prevention of Cruelty and Supervision of Experiments on Animals) |
| 14) | Detail of location of proposed BT Park<br>1. Survey no/Plot no.<br>2. Village / Town / City<br>3. Taluka / District<br>4. Total Area in Sq. Mt.<br>5. NA Permission<br>6. Zone confirmation<br>7. NOC under location Policy<br>Building Plan Approval | : | Under ownership<br>Under lease |
| 15) | Details of Motive Power<br>1. Total Power Requirement in MW<br>2. Dedicated /sub-Station<br>3. Separate Feeder line<br>Standby Power Generation arrangement for min. 30% of total power. | : | |

| | | | |
|---|---|---|---|
| **16)** | Detail of Internet Connectivity (Min.5.0 Mbps) | : | |
| **17)** | **Detail of common utility services proposed in the BT Park** | | |
| | Type | Capacity | Proposed arrangement |
| | | | |
| **18)** | **Built-up Area Proposed /usage Information** | | |

| **Total Plot Area / Total BUA** | **BUA for BT Units** | **BUA for Support Services** | **Area for distilled water plant** | **Area for CETP** | **Area for Common Hazardous waste** | **Parking slots proposed** |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | |

Declaration: -

I hereby declare that I am authorized to submit application for BT Park on behalf of the BT Park. The documentary evidence in support of the information/ particulars stated by me in this application form is true and correct to the best of my knowledge and belief. I, further undertake to use and ensure the use of the premises of the Bio Technology Park exclusively for Bio Technology Activities. Further, I am aware that penal action would be taken against me without informing me with cost to me for unauthorized activity/ use of approved BUA of BT Park for other than BT Activities.

**Date:** **Signature of applicant**

**Place:** **Designation**

**List of documents require to be submitted along with Application Form**

1. **Developer company constitution documents.**
   - **A. For Private Limited Company**
     1. Certificate of incorporation with memorandum & Article of Association.
     2. Board resolution for development of BT Park
     3. Letter of Authority for application (Authorized signatory)
   - **B. For Public Ltd. Company**
     1. Certificate of incorporation with memorandum & Article of Association.
     2. Board resolution for development of BT Park
     3. Letter of Authority for application.
   - **C. For partnership Firm**
     1. Copy of partnership deed
     2. Copy of firm registration
     3. Letter of authority for application
   - **D. Cooperative Society**
     1. Registration under Society Act.
     2. Letter of authority for application
   - **E. Charitable Trust.**
     1. Registration under Public Charitable Trust Act.
     2. Letter of authority for application

2. **Land documents**
   - **A. For own Land**
     1. Copies of 7/12 abstract of Land
     2. Copy of index
     3. Copy of Property Card
     4. ULC /BTAL Permission if applicable
   - **B. For lease/Development Agreement land**
     1. Copy of Agreement executed with the Landlord
     2. Power of authority to leases
     3. Copy of Land possession letter
     4. ULC Permission if applicable
3. **Copy of Challan of fee deposited in Govt. treasury for Rs. 5000/**
4. **Copy of Zone confirmation certificate issued by appropriate authority**
5. **Building Plan approval copy with letter of approval**
6. **Copy of Building construction commencement certificate issued by appropriate authority**
7. **MPCB consent for establishment of BT Park**
   1. Permission for CETP
   2. Solid Hazardous waste disposal agreement approval
8. **Copy of receipt of application submitted to (Whichever is applicable)**
   1. Ministry of Environment and Forests (MoEF)
   2. Genetic Engineering Approval Committee (GEAC).
   3. Indian Council of Medical Research (ICMR)
   4. Maharashtra Pollution Control Board (MPCB)
   5. Drugs and Cosmetics Act, Ministry of Health and Family Welfare
   6. Atomic Energy Regulatory Board (AERB)] Govt. of India
   7. CPCSEA (Committee on Prevention of Cruelty and Supervision of Experiments on Animals)

9. **Water supply arrangement made**
   1. Proof of Water supply arrangement for BT Park
   2. Provision of common supply for distilled water / chilling plant requirement of laboratories likely to be established in BT Park.
10. **Motive Power**
    1. Agreement made for dedicated substation for required motive power
    2. Separate feeder for dedicated substation
    3. Standby arrangement for not less than 30% of total power requirement.
11. **Affidavit in prescribed form provided with application form.**
12. **Agreement made for utilities**
    1. Chilling plant
    2. Steam generation
    3. Storage facility ( Raw material and finished product)
13. **Building plan approval from Department of Industrial Safety and Health.**

-----